भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उप अभियंता (गट-अ) पदावरील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः आपना २०१४/प्र.क्र.८९/पापु-१५

७ वा मजला,जी.टी. रुग्णालय इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीखः १६ मार्च, २०१५

**वाचा :-**

१) शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आपना २०१३/प्र.क्र. २४९ / पापु-१५, दिनांक ३१.७.२०१४

**शासन आदेश :-**

श्री. नितीन मुरलीधर दंडगव्हाळ यांची संदर्भाधिन आदेशान्वये, उप अभियंता (गट-अ) या पदावर यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर येथे नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली आहे. श्री. एच. व्ही. अत्रे, उपअभियंता (यां) हे उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नाशिक विभाग, नाशिक येथे कार्यरत आहेत. श्री. दंडगव्हाळ व श्री. अत्रे यांनी त्यांची आपापसात बदली करण्यात यावी अशी विनंती केली असल्याने श्री. नितीन मुरलीधर दंडगव्हाळ यांची उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नाशिक विभाग, नाशिक येथे श्री. एच. व्ही. अत्रे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर व श्री.एच.व्ही. अत्रे यांची यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर येथील उप अभियंता (गट-अ) येथे श्री. नितीन मुरलीधर दंडगव्हाळ यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर आपापसात बदली करण्यात येत आहे. श्री. दंडगव्हाळ व श्री. अत्रे यांची बदली त्यांच्या विनंतीनुसार आपापसात करण्यात येत असल्याने त्यांना त्यांच्या पदावर रुजू होण्यासाठी कोणत्याही प्रकारचा प्रवासभत्ता व अनुषंगीक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

**२. हे आदेश, तात्काळ अंमलात येत असून, वर नमूद केलेल्या अधिका-यांच्या बदली आदेशांची सर्व संबंधितांनी तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने पुढील सुचनांचे कटाक्षाने पालन करावे.**

अ) बदली झालेल्या अधिका-यास संबंधित कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करुन तसे संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना कळवावे. तसेच, बदली झालेल्या अधिका-यांनी त्यांची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

ब) बदली झालेल्या अधिका-यास बदलीच्या ठिकाणी संबंधित कार्यालयात आल्यानंतर विनाविलंब हजर करुन घ्यावे, अन्यथा संबंधित कार्यालयप्रमुखास जबाबदार धरण्यात येईल.

क) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिका-याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास संबंधित अधिकारी शिस्तभंगविषयक कार्यवाहीस पात्र ठरतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०४१२३९०५२२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NIKAM CHETAN B

Digitally signed by NIKAM CHETAN B
DN: CN = NIKAM CHETAN B, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.16 20:32:37 +05'30'

**(चेतन निकम)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, नाशिक
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, अहमदनगर/नाशिक.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/नाशिक
५. संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)
६. निवडनस्ती (पापु-१५)